**महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ मर्या., मुंबई**
**अनुदान मंजूर करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
शासन निर्णय क्रमांक : सूतगि २००८/प्र.क्र. १७५/टेक्स-१ (ब)
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २२ जून, २०१०

संदर्भ :- १) महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ मर्या., मुंबई यांचे पत्र क्रमांक एडीएम/लेखा/अनुदान/२००८-०९/३५९ दिनांक १५ ऑक्टोबर, २००८
२) संचालक, वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर यांचे पत्र क्रमांक कार्यासन ६(१)/सूतगि/१३२६२/२००८ दिनांक २३ डिसेंबर, २००८

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ मर्या., मुंबई ही वस्त्रोद्योगातील सहकारी संस्थांची प्रतिनिधी संस्था आहे. महासंघाची नोंदणी महाराष्ट्र राज्य सहकारी संस्था अधिनियम १९६० मधील तरतूदीनुसार दिनांक २२.१२.१९७० रोजी झालेली आहे. राज्यातील सहकारी सूतगिरण्यांबरोबरच वस्त्रोद्योगातील इतर सहकारी संस्थांना आर्थिक व तांत्रिक मार्गदर्शन करणे. तसेच वस्त्रोद्योग संचालनालय व राज्य शासन, वस्त्रोद्योगातील सहकारी संस्था यांच्यामधील दुवा म्हणून काम करणे हे संस्थेचे मुख्य उद्दिष्ट आहे. महासंघास आतापर्यंत सन १९८४-८५ ते १९८८-८९, १९८९-९० ते १९९३-९४, १९९९-२००० ते २००३-०४ आणि २००४-०५ ते २००८-०९ या कालावधीत प्रतिवर्ष अनुक्रमे रु. ३.०० लाख, रु. १०.०० लाख, रु. १५.०० लाख आणि रु. २५.०० लाख इतके अनुदान मंजूर करण्यात आले आहे. जागतिक मंदीमुळे उत्पादनाखालील सहकारी सूतगिरण्यांकडून आवश्यक त्या प्रमाणात वार्षिक वर्गणीची रक्कम न मिळणे, शासनाने नविन सहकारी सूतगिरण्या नोंदणी करणे बंद केल्यामुळे तसेच फक्त नोंदणीकृत गिरण्यांची नोंदणी रद्द करणे किंवा अन्य प्रकल्पात रुपांतर करण्याचे आदेश असल्यामुळे प्रकल्प अहवाल तयार करण्याचे शुल्क न मिळणे, शासनाकडून शासकीय भाग भांडवलाची संपूर्ण रक्कम न मिळाल्यामुळे सूतगिरण्या अनेक वर्षापासून उतपादनाखाली न येता बांधकाम अवस्थेत असणे, परिणामी त्यांचेकडून सुध्दा आवश्यक त्या प्रमाणात वार्षिक वर्गणीची रक्कम न मिळणे, वाढत्या महागाईनुसार कर्मचाऱ्यांना वेतनवाढ देणे, नविन तांत्रिक प्रशासकीय अधिकाऱ्यांची नियुक्ती करणे, सामान्य प्रशासन विभागाने कार्यालयीन जागेचे भाडे मोठ्या प्रमाणात वाढविणे, शासनाने एकाधिकार कापूस खरेदी योजना बंद केल्यामुळे त्यांचेकडून सहकारी सूतगिरण्यांनी खरेदी केलेल्या कापूसगाठींवर पूर्वी मिळणारे सेवाशुल्क न मिळणे इत्यादी कारणांमुळे महासंघाला शासनाकडून कायमस्वरुपी आर्थिक मदतीची गरज असल्याचे महासंघाने नमूद करुन, सन २००९-१० या वर्षापासून कायमस्वरुपी सरसकट

प्रतिवर्ष रुपये ५०.०० लाख अनुदान मंजूर करण्यासाठी शासनास प्रस्ताव सादर केलेला आहे. सदर अनुदान मंजूर करणेचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ मर्या., मुंबई या महासंघास सन २००९-१० पासून कायमस्वरुपी सरसकट प्रतिवर्ष रु. ५०.०० लाख इतके अर्थसहाय्य अनुदान स्वरुपात मंजूर करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. हा शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३४७/२०१०/व्यय-२, दिनांक १५/६/२०१० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेब साईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१००६२२१५०९४२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(श्री. का. पवार)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

प्रति,

१) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
२) संचालक, वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर
३) प्रादेशिक उपसंचालक, वस्त्रोद्योग, मुंबई
४) वित्त विभाग, व्यय-२, मंत्रालय, मुंबई ३२
५) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
६) महालेखापाल (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य १/२, मुंबई/नागपूर
७) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ मर्या., मुंबई
१०) कार्यासन अधिकारी, १७ सी/१६ सी/टेक्स १ (अ), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग
११) कार्यासन अधिकारी, रोखशाखा, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) निवड नस्ती

G:\SR Tex 1 B.\wpRKD2